# बगदादचा हत्ती



लेखक: मेरी होल्म्स व जॉन हॅरिस
चित्रे: जॉन कॅनेल
मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक

शार्लमेन सम्राटाची सफेद हत्तीबरोबर मैत्री होईल असं कुणाला तरी खरं वाटेल का. नाही वाटत ना, पण बगदादच्या खलीफाने भेट दिलेल्या हत्तीबाबत हे घडलं.

हा हत्ती मोठ्या कळपासोबत सोंडेत भलामोठा लाकडी ओंडका घेऊन इजिप्त, भूमध्य समुद्र पार करून इटलीला पोचला. तिथून आल्प्सच्या बर्फाळ पर्वतरांगांमधून प्रवास करत शार्लमेनकडे जर्मनीत पोचला. ह्या खास पाहुण्याला पाहून शार्लमेन भलताच खूष झाला. त्याने अनेक लहान मुलांशी त्याची ओळख करून दिली. शार्लमेन त्याला आपल्या राजवाड्याबाहेर खास गरम पाण्याच्या फवाऱ्याने आंघोळ घालायचा. त्याने त्याला सैन्यदलामध्ये दाखल केले होते आणि डॅनिश शत्रूबरोबरच्या युद्ध्यात हत्तीने पराक्रम गाजवला होता. म्हातारा झाल्यावर हत्ती जेव्हा वारला तेव्हा शार्लमेन धाय मोकलून रडला.

# बगदादचा हत्ती



लेखक: मेरी होल्म्स व जॉन हॅरिस
चित्रे: जॉन कॅनेल
मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक

सहा फुटाहून उंच असलेला तो राजबिंडा तरुण कपडे उतरवून गरम पाण्याच्या तलावात उडी मारायचा. दुसऱ्या बाजूने एक हत्ती त्या पाण्यात डुबकी मारून त्याच्याजवळ यायचा. मग दोघेही मित्र एकमेकांच्या अंगावर पाणी उडवत मजा करायचे.



कोण बरं होते हे दोघे आनंदी प्राणी?



अबू



शार्लमेन

त्यातील एक होता अबू हत्ती. मुस्लिम देशातल्या बगदाद ह्या शहरातून भलामोठा प्रवास करून आला होता. आणि दुसरा होता शार्लमेन सम्राट, तो जर्मनीत आचेन येथे भव्य आणि पुरातन राजवाड्यामधे राहत होता. त्याचे युरोपवर राज्य पसरले होते. पण हे दोघे कुठे बरं भेटले?

मी एक साधा भिक्षू आहे. मला माहीत आहे तेवढे मी तुम्हाला सांगतो. माझ्या गुरुंनी ही गोष्ट मला लिहायला सांगितली आहे. मी थोडं तोतरं बोलतो पण गाताना मात्र मी अडखळत नाही.



शार्लमेन उंच, धिप्पाड आणि बलदंड होता. सोनेरी केसाच्या शार्लमेनला भरघोस मिश्या होत्या. आपल्याकडे असलेली ताकद आणि सत्ता दर्शवण्यासाठी तो नेहमी भलीमोठी सोन्याची तलवार बाळगत असे.



**शार्लमेन**



राजाच्या संग्रहालयातील तलवार

**हारुन अल-रशीद (763-809 CE)**



शार्लमेन एक जिज्ञासू व्यक्ति होता. पूर्वेकडील एका महान राजाबद्दल त्याने बरेच ऐकले होते. त्याच्याकडे त्याने शिकण्यासाठी जायचे ठरवले. तो राजा म्हणजेच शख्स बगदादचा महान खलीफा- हारुन अल-रशीद.

शार्लमेनने आपल्या काही विश्वासू माणसांना हारूनच्या दरबारात भेट घेण्यासाठी पाठवले. जर्मनीतून त्यांनी आल्प्स पर्वताला वळसा घेऊन इटलीपर्यंत हजारो मैलाचा प्रवास करत शेवटी बोटीने भूमध्य सागर पार केला.



यूरोपमधून दूत बग़दादला पोचले तेव्हा तिथले दृश्य पाहून त्यांचे डोळे विस्फारले. तिथल्या गल्ल्यांमध्ये गायक गात होते, विद्वान चर्चा-वादविवाद करत होते, शेकडो सुंदर इमारती, वाचनालये, मशिदी आणि आकाशाला भिडणारे चमचमते मनोरे पाहून ते स्तब्ध झाले.



हारुन अल-रशीद ह्या सुंदर महान शहराच्या मधोमध एका भव्य सोनेरी प्रासादात राहत होता. त्याने शार्लमेनच्या राजदूतांचं खुल्या दिलाने स्वागत केलं.

शार्लमेनसारखेच हारुनही जिज्ञासू होता. त्यालाही पश्चिमेच्या शक्तिशाली सम्राटाबद्दल जाणून घ्यायची उत्सुकता होती.

अनेक आठवडे, महिने त्यांनी हारूनच्या कलाकार, संगीतकार, विद्वान, गणितज्ञ, स्थापत्यविशारद, कवी ह्यांच्या बरोबर व्यतीत केला. सगळे राजदूत हे सगळं पाहून आणि जाणून दिपून गेले. विज्ञान, वैद्यकीय, तंत्रज्ञान, कला ह्या अनेक क्षेत्रात बगदादमधल्या लोकांचे ज्ञान होते जे युरोपियन लोकांना अजूनही माहित नव्हते. युरोपियन लोकांसाठी अनेक मैफिली आणि मेजवान्या आयोजित केल्या. त्यांच्यासाठी खास बर्फ घातलेले गारेगार सरबत बनवले गेले.

हे सगळं स्वप्नवत होते!



शेवटी काही दिवसांनी राजदूतांनी शार्लमेनच्या दरबारात परत निघण्याचे ठरवले. परंतु हारुन अल-राशिद ह्या खास पाहुण्यांना रिकाम्या हाती कसे परत पाठवतील? त्यांनी सम्राट शार्लमेनसाठी अनेक उत्तोमोत्तोम भेटवस्तूं मोठ्या पेटाऱ्यात भरल्या.



हारूनने भेट पाठवलेला रत्नजडीत किमती पाण्याचा जग

हारुनचे भेटवस्तू – कृपाण आणि तलवार

परंतु इतक्याच भेटवस्तू नव्हत्या काही.

हारुनने आपल्या कारागीरांना एक सुंदर घड्याळ बनवण्याचा आदेश दिला. प्रत्येक तासाला वपितळेच्या काट्याचा झांजा वाजे व वेळ सांगितली जाई. घड्याळाच्या खाली बारा दारे होती. तासाचा काटा वाजला कि त्या तासाच्या समोरचे दार उघडले जाई व घोड्यावर स्वार असलेली बाहुली बाहेर येई.

ते घड्याळ म्हणजे अगदी अरेबियन नाइट्स च्या गोष्टीतील जादुई घड्याळच होते.

अजूनही हारूनचे समाधान होत नव्हते.

पश्चिममेच्या महान सम्राटासाठी अजून एक खास भेट पाठवायचे हारूनच्या मनात होते.

त्याने भरपूर विचार केला. विचारांती त्याला वाटले कि आपल्या दरबारातील अनमोल आणि सुंदर असा अबू हत्ती शार्लमेनसाठी पूर्ण वेगळी आणि शानदार भेट होईल.



अबू जन्मत: पांढराशुभ्र होता त्यामुळे तो वेगळा आणि अमुल्य होता. म्हणून त्याच्या देखरेखीसाठी इसाक नावाचा ज्यू माणूस नेमला होता. इसाकचे खाणे, पिणे, झोपणे सगळे काही अबूच्या शेजारी असे. अबूबरोबर तो सावलीसारखा राहत असे.त्यामुळे साहजिकच अबूबरोबर इसाकही शार्लमेनच्या दुतांबरोबर प्रवासाला निघाला.







मौल्यवान घड्याळ आणि किमती भेटवस्तू असा लवाजमा घेऊन राजदूत बगदादहून निघाले. हारूनने दिलेली सर्वात शानदार भेट म्हणजे अबू हत्ती. त्याच्या अंबारीवर ते खास घड्याळ ठेवण्यात आले.

हा सगळा तांडा इतका सुंदर दिसत होता. खरंच हे सगळं स्वप्नवत वाटत होते!






पाचशे वर्षांपूर्वी जनरल हनीबील पस्तीस हत्तींना घेऊन आल्पस पर्वतरांगा ज्या मार्गाने ओलांडून गेला होता त्याच वाटेने हेही सगळे चालले होते.

कसला अविस्मरणीय प्रवास होता तो! उत्तुंग हिमशिखरे आणि बाजूला खोल दरी ह्याच्या मधून जाणारा रस्ता सुंदर पण भीतीदायकही होता.

साधारण दोन वर्षाचा प्रवास करून ८०२ सालातल्या जुलै महिन्यात शेवटी हा तांडा शार्लमेनच्या राजधानीत पोचला. देखणा हत्ती आणि आगळं वेगळं घड्याळ पाहून शार्लमेन खुश झाला. अबू हत्तीला राजधानीची सफर घडवली. इसाकने त्याला लोकांना हवेत सोंड उडवून अभिवादन करायला सांगितले. जणू काही त्याला म्हणायचे होते कि मी तुम्हाला मुजरा करतो आहे.



शार्लमेनने अबू आणि इसाकला त्याच्यासोबत राजवाड्यात राहायला बोलावले. दिवसातून एक-दोनवेळा तरी शार्लमेन आपल्या नवीन मित्राला भेटायचा. सकाळी त्याला खाणे खायला द्यायचा.

एका मोठ्या तलावात अबुला डुंबण्यासाठी साठी नेहमी ताजे पाणी ठेवली जाई. शार्लमेन आला की अबू त्याच्या तोंडावर-अगांवर सोंडेने पाणी उडवी. इतके सुंदर दृश्य असे ते!

शार्लमेन त्याच्याकडे आलेल्या सगळ्या शाही पाहुण्यांना, राजा-राण्यांना अबू हत्ती कौतुकाने दाखवी. त्यांची मुलेही अबूला पाहून आनंदून जात. आपल्या कलाकारांना त्याने अबुची चित्रे काढायला सांगितली. अबूची छबी नाण्यांवर तसेच पूर्ण राज्यातल्या कापडावर उमटवली गेली.










आचेन शहरात शार्लमेनच्या स्मारकाजवळ असलेल हत्तीच्या डिझाइनचे कापड ( आता ॲक्स-ला-चॅपेल म्हणून ओळखले जाते)



अबूच्या अंगावर लष्करी चिलखत घालून शार्लमेन आपल्या डच शत्रूबरोबर लढाईवर गेला. पांढऱ्या रंगाचा हत्ती पाहून शत्रूचे सैनिक घाबरले आणि शस्त्र टाकून पळून घेले. त्यांना वाटले पांढरा हत्ती म्हणजे काहीतरी भुताटकी आहे.



आता अबूही आपल्या मालकाप्रमाणे म्हातारा झाला. शार्लमेनने इसाक आणि त्याच्यासाठी ऑक्सबर्ग शहरात खास नदीजवळ घर बांधले. ज्यामुळे अबूला रोज नदीत आंघोळ करता येऊ शकेल. शार्लमेन त्याला अधून मधून भेटायला येई. “माझ्या शूर मित्रा” म्हणून त्याच्या सोंडेला प्रेमाने थोपटे.



अबूचा साल ८१० ला मृत्यु झाला.

आपल्या खास मित्राच्या मृत्यूची बातमी कळल्यावर शार्लमेन खूप रडला.



पश्चिमेचा महान सम्राट आणि पूर्वेचा एक सफेद हत्ती ह्यांची इतकी गाढ मैत्री होईल अशी कुणी कशीतरी कल्पना केली असेल का?

पण ह्याचे कारण ते दोघेही असामान्य होते. आहे त्या परिस्थितीत दोघेही एकमेकांना धरून होते, समजून घेत होते. आता तुम्ही म्हणाला एक माणूस आणि हत्तीचे असे नाते कसे काय शक्य आहे?



पण मी शपथेवर सांगतो कि हे अगदी खरं आहे. समाप्त